सन २०२२-२३ मध्ये कृषि यांत्रिकीकरण उप अभियानांतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.४९८६.३३ लाख निधी वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक :-कृयांयो-२०२२/प्र.क्र.१९२/८-अे
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२३.

संदर्भ:-

१. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.३-१/२०१५-M&T(I&P) दि. १२.१०.२०२२
२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक कृयायो-२०२२/प्र.क्र.१९२/८-अे, दि.१५.११.२०२२
३. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.३-१/२०१५-M&T(I&P) दि. २७.३.२०२३
४. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक कृयायो-२०२२/प्र.क्र.१९२/भाग-२/८-अे, दि.२८.३.२०२३
५. संचालक (गु.व नि.), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.कृआ/गुनि-५/नक्र १६७/२०२२-२३/ ११०४१/ २०२३ दि. २७.३.२०२३

प्रस्तावना :

राज्यात केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण उपअभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियानांतर्गत एकूण आठ घटक असून घटक क्र. १ व २ हे नवीन तंत्रज्ञानाने विकसित केलेल्या संयंत्रांची प्रात्यक्षिके, प्रशिक्षण व चाचणीबाबत आहेत. घटक क्र. १ व २ यासाठी केंद्र हिश्श्याचे प्रमाण १०० टक्के आहे. उर्वरित ६ घटकांसाठी केंद्र व राज्य शासनाच्या निधी हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने संदर्भ १ अन्वये कृषि यांत्रिकीकरण अभियानासाठी सन २०२२-२३ करिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा रु. ३५५२.६७ लाखव समरुप राज्य हिस्सा रु. २३६८.४५ लाख अशा एकूण रु.५९२१.२२ लाख निधीच्या कार्यक्रमास मान्यता देऊन केंद्र हिश्श्याचा रु. ३५५२.६७ लाख निधी वितरित केला आहे. सदर मान्यतेच्या अनुषंगाने संदर्भ क्र. २ दिनांक १५.११.२०२२ च्या शासन निर्णयान्वये सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.५९२१.२२ निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून निधी वितरीत करण्यात आला आहे.

आता केंद्र शासनाने संदर्भाधीन क्र. ३ च्या पत्रान्वये केंद्र हिस्सा रु. ३६९१.८० त्यास समरुप राज्य हिस्सा रु. २४६१.२० लाख अशा एकूण रु. ६१५३.०० लाख निधीच्या कार्यक्रमास मान्यता दिलेली आहे. सदर मान्यतेच्या अनुषंगाने रु. १२०७४.१२ लाख निधी (केंद्र हिस्सा रु. ७२४४.४७ लाख व राज्य हिस्सा रु. ४८२९.६५ लाख) इतक्या निधीस संदर्भ क्र. ४ दिनांक २८.३.२०२३ च्या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. केंद्र शासनाच्य उपरोक्त पत्रान्वये वितरीत केलेला सर्वयाधारण प्रवर्गाचा रु. २९९१.८० लाख व त्यास अनुरुप राज्य हिस्सा रु. १९९४.५३ आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्याची बाब बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :

१. सन २०२२-२३ मध्ये कृषि यांत्रिकीकरण उप-अभियानाच्या अंमलबजावणीकरिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा रु.२९९१.८० लाख निधी (रुपये एकोणतीस कोटी एक्याण्णव लाख ऐंशी हजार फक्त) व राज्य हिस्सा रु.१९९४.५३ (रुपये एकोणीस कोटी चौऱ्याण्णव लाख त्रेपन्न हजार फक्त) असे एकूण रु. ४९८६.३३ (रुपये एकोणपन्नास कोटी शहाऐंशी लाख तेहत्तीस हजार फक्त) आयुक्त, कृषि यांना वितरित करण्यात येत आहे.

२. सदर योजनेंतर्गत मंजूर केलेला रु. ४९८६.३३ लाख निधी खालील लेखाशिर्षाखाली चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

| केंद्र | राज्य |
|---|---|
| मागणी क्रमाक:- डी-३<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(००)११३-कृषि अभियांत्रिकी<br>(००) (०८) कृषि उन्नती योजना कृषि अभियांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो),<br>(केंद्र हिस्सा ६० टक्के) (२४०१ २५१३)<br>३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमाक:- डी-३<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(००)११३-कृषि अभियांत्रिकी<br>(००) (१६) कृषि उन्नती योजना कृषि अभियांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो),<br>(राज्य हिस्सा ४० टक्के) (२४०१ ८७३६)<br>३३ अर्थसहाय्य |

३. या उप-अभियानाकरीता वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने वार्षिक कृति आराखड्यात मंजूर केलेल्या बाबींवर खर्ची टाकावा तसेच, अनुदानाची रक्कम लाभार्थ्यांना महा-डीबीटी प्रणालीद्वारे आधारसंलग्न बँक खात्यावर सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीव्दारे जमा करावी.

४. सदर योजनेंतर्गत ट्रॅक्टर या बाबीसाठी अनुसूचित जाती/जमाती, महिला, अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांसाठी किंमतीच्या ५०% किंवा रु. १.२५ लाख यापैकी जे कमी असेल ते आणि इतर शेतकऱ्यांसाठी ४०% किंवा रु.१ लाख यापैकी जे कमी असेल ते याप्रमाणे अनुदान देण्यात यावे.

५. इतर यंत्र/अवजारांच्या बाबतीत केंद्र शासनाच्या कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना, अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

६. सदर निधी खर्च करतान तो विहित कार्यपध्दती अनूसरून सर्व वित्तीय कायदे/प्रक्रियाचे/वित्तीय अधिकारांच्या मर्यादे/C.V.C. तत्वानुसार/ प्रचलित शासन निर्णय/ नियम/ परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कर्यालयाची राहील.

७. कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी, संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन उदिष्टनिहाय अंमलबजावणी विषयक सविस्तर सूचना सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगतीचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याच्या ५ तारखे पर्यंत केंद्र शासनास सादर करावा.

८. सदर अभियानाकरिता वितरित केलेला निधी कोषागारातून आहरित करण्याकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून आणि सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाकित दि. ४ एप्रिल, २०२२ व १६ मार्च, २०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी शर्तीची

पूर्तता करुन तसेच वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.११४/२०२३/व्यय-१, दिनांक ३१.३.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३३१२१४१०१२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2023.03.31 21:48:00 +05'30'

**(महेंद्र घाडगे)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा. मंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई-३२.
२. अ.मु.स.(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
३. अ.मु.स.(नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
४. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. सर्व संचालक/सह संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
७. विभागीय कृषि सह संचालक (सर्व).
८. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व).
९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता).
१०. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
११. नियोजन विभाग (का-१४३१) मंत्रालय, मुंबई-३२.
१२. वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) मंत्रालय, मुंबई- ३२.
१३. निवड नस्ती (कार्यासन -८ अे).